**प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल या कार्यालयासाठी सिडको यांचेकडून भाडेतत्वावर मंजूर करण्यात आलेल्या खारघर येथील नवीन जागेच्या भाड्याची रक्कम अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२५ /प्र.क्र. ६७ /परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२५

वाचा :-

१. परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.पकाभू (४६) १११६/न.क्र.४१ /का.१०(१)/ २०२५/ जा.क्र.१५२२, दि.०५.०२.२०२५ व जा.क्र.३१५९, दि.१७.०३.२०२५
२. शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको) यांचे पत्र.क्र.CIDCO/ Div, Office(KH&KMT)/३५२५, दि.१४.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल हे सन २०१०-११ पासून केंद्रीय सुविधा भवन, कळंबोली येथे भाडेतत्वावर कार्यरत आहे. सदर इमारत मोडकळीस आली असून त्यामध्ये वारंवार पडझड होत असल्याने कार्यालयीन अधिकारी /कर्मचारी व कार्यालयात ये-जा करणाऱ्या अभ्यागतांचे जीवीतास धोका निर्माण झालेला आहे. तसेच पनवेल महानगरपालिकेने सदर इमारत धोकादायक घोषित करुन नोटीस बजावली असल्याने प्रादेशिक परिवहन कार्यालय इतरत्र स्थलांतरीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको), नवी मुंबई यांचेकडून खारघर पनवेल येथील व्हॅली शिल्प को.ऑ.हौ.सो., बिल्डींग नं. एच-१, सेक्टर-३६ येथील शॉप नं. १०१,१०२,१०३,१०४,२०१,२०२,२०३,२०४ (सुमारे १११२.७६ चौ.मी. कारपेट एरिया) ही जागा भाडेतत्वावर मंजूर करण्यात आली आहे. त्यासाठी शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको), नवी मुंबई यांनी ११ महिन्याचे भाडे रक्कम रु.४६,६४,७३४.३५/- (डॉक्यूमेंटेशन चार्जेस व जीएसटी सह) इतके निश्चित केले असल्याचे कळविले आहे. तसेच शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको), नवी मुंबई यांनी केलेल्या विनंतीनुसार यापैकी ३ महिन्यांचे भाडे रु.१२,७२,०३९.३९/- (१८% जीएसटीसह) व रू. ५९०/- डॉक्यूमेंटेशन चार्जेस (१८% जीएसटीसह) अशी एकूण रू.१२,७२,६२९.३९/- इतकी रक्कम त्यांना ताबापूर्व अदा करणे आवश्यक आहे. त्यानुसार सदर जागेच्या ११ महिन्याच्या भाडयाच्या रकमेस व त्यापैकी ३ महिन्यांचे भाडे ताबापूर्व अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय: -</u>**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल या कार्यालयासाठी शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको), नवी मुंबई यांचेकडून भाडेतत्वावर मंजूर करण्यात आलेल्या खारघर, पनवेल येथील व्हॅली शिल्प को.ऑ.हौ.सो., बिल्डींग नं. एच-१, सेक्टर-३६ येथील शॉप नं. १०१,१०२,१०३,१०४,२०१,२०२,२०३,२०४ (सुमारे १११२.७६ चौ.मी. कारपेट एरिया) या जागेचे ११ महिन्याचे भाडे रक्कम रु.४६,६४,७३४.३५/- (डॉक्यूमेंटेशन चार्जेस व जीएसटी सह) इतक्या रकमेस व यापैकी ३ महिन्यांचे भाडे रु.१२,७२,०३९.३९/- (१८% जीएसटीसह) व रू. ५९०/- डॉक्यूमेंटेशन चार्जेस (१८% जीएसटीसह) अशी एकूण रू.१२,७२,६२९.३९/- इतकी रक्कम त्यांना ताबापूर्व अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल या कार्यालयासाठी शहर औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको) यांच्यासोबत करावयाच्या भाडेपट्टा करारनाम्यावर शासनाच्या वतीने स्वाक्षरी करण्यास प्रादेशिक परिवहन अधिकारी, पनवेल यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल या कार्यालयाच्या भाडेपोटी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, मुख्यलेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालये, (दत्तमत) (२०४१ ००३६) १४ भाडेपट्टी व कर" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-एक ,अनुक्रमांक १०, नियम क्र.११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १४७ (क) खालील टीप-१ अन्वये असलेल्या अधिकारान्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१२४५५५८०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.03.20 12:47:04 +05'30'

**(सु.बा.आपटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. प्रादेशिक परिवहन अधिकारी, पनवेल
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (परि-४)